**महाईस्कॉल पोर्टलवरील विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील विद्यार्थ्यांचे सन २०११-१२ ते २०१७-१८ या कालावधीतील शिष्यवृत्ती व फ्रीशीप योजनेअंतर्गत नोंदणीकृत प्रलंबित अर्ज निकाली काढणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : इबीसी २०१७/प्र.क्र.७३/शिक्षण,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १८ जानेवारी, २०१९

<u>संदर्भ</u> :- १) शासन निर्णय,समक्रमांक, दि.२४/५/२०१८.
२) शासन परिपत्रक क्र.विभशा २०१८/प्र.क्र.१३६/शिक्षण, दि.२९/०९/२०१८.
३) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय,महाराष्ट्र राज्य पुणे यांचे पत्र क्र. विजाभज/शिक्षण/प्रलंबित अर्ज/ऑफलाईन/शानिम/२०१८-१९/१२७, दि.१६/०१/२०१९

**<u>शासन परिपत्रक-</u>**

या विभागाचे महाईस्कॉल पोर्टल दिनांक २२/११/२०१८ रोजी पुर्नजिवित करण्यात आले असून पोर्टलवरील महाविद्यालयाचे लिपीक व प्रिन्सिपल लॉगिन तसेच सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण कार्यालयाचे लिपीक व SDWO लॉगिन कार्यान्वित करण्यात आले आहे. तथापि, सदरच्या प्रणाली मधून फक्त सन २०१६-१७ चे प्रलंबित अर्जांवर मंजूरी प्रकिया करण्यात येत आहे. त्यामध्ये २०११-१२ ते २०१५-१६ चे जे अर्ज सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण व संबंधित महाविद्यालय यांचे login वर प्रलंबित आहेत, त्यावर online मंजूरीची प्रक्रिया करता येत नाही. त्यामुळे असे २०११-१२ ते २०१६-१७ पर्यन्तचे महाईस्कॉल प्रणाली मधील अर्ज अद्याप प्रलंबित असल्याचे निदर्शनास आले आहे.

संदर्भीय शासन परिपत्रक क्रमांक २ अन्वये सन २०११-१२ ते २०१७-१८ या कालावधीतील शिष्यवृत्ती व फ्रीशीप योजनेअंतर्गत महाईस्कॉल पोर्टलवरील ऑनलाईन नोंदणीकृत प्रलंबित अर्ज निकाली काढण्यामध्ये येणाऱ्या अडचणींचे निराकरण करण्याकरीता जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती नियुक्त करण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने सन २०११-१२ ते २०१७-१८ या कालावधीतील अर्ज निकाली काढण्याबाबत खालील प्रमाणे १ ते ८ अटींचे तंतोतंत पालन करण्याच्या सूचना निर्गमित करण्यात येत आहेत:-

१. सन २०११-१२ ते २०१६-१७ या कालावधीत केवळ महाईस्कॉल प्रणाली मधील ऑनलाईनरित्या नोंदणी झालेले विजाभज, इमाव व विमाप्र प्रवर्गातील विद्यार्थ्यांचे शिष्यवृत्ती/फ्रीशीपचे प्रलंबित अर्ज निकाली काढण्यास परवानगी देण्यात येत आहे. सदर कालावधी मध्ये महाईस्कॉल पोर्टलवरील ऑनलाईन प्राप्त झालेल्या अर्जा व्यतिरिक्त इतर कोणत्याही प्रकारचे अर्ज मंजूर करण्यात येऊ नयेत.

२. सन २०११-१२ ते २०१६-१७ या कालावधीतील प्रलंबित अर्जाचा महाईस्कॉल प्रणाली मधील Data संबंधित सहाय्यक आयुक्त यांनी आपल्याकडे download करुन घेवून तो जतन करण्यात यावा. तसेच या प्रणालीमध्ये प्रलंबित अर्जाचे Print out काढून प्रमाणित करावे. या प्रणाली व्यतिरीक्त कोणताही इतर अर्ज स्विकारता येणार नाही. मात्र अदायगीसाठी Bill तयार करुन ऑफलाईन पध्दतीने पाठवावे.

३. सदरील प्रलंबित अर्ज निकाली काढतांना प्रचलित शासन निर्णयानुसार अनुज्ञेय अभ्यासक्रमांनाच शिष्यवृत्ती/फ्रिशीप अदा होईल तसेच दुबार देयके मंजूर होणार नाहीत याची सर्व संबंधित सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांनी दक्षता घ्यावी.

४. व्यावसायिक अभ्यासक्रमाचे शुल्क हे शुल्क नियामक प्राधिकारणाने मान्य केलेल्याच दराने अदा होईल याची दक्षता घेण्यात यावी.

५. विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभागाकडून शिक्षण शुल्काची रक्कम अद्याप प्राप्त झालेली नसल्याने शैक्षणिक वर्ष संपुष्टात आल्यानंतर महाविद्यालयांकडून अंतिम दाखला देतेवेळी विद्यार्थ्यांच्या पालकांकडून शिक्षण शुल्काची रक्कम वसुल करण्यात येते. सबब, संबंधित महाविद्यालयाने शिक्षण शुल्काची विद्यार्थी/ विद्यार्थ्यांच्या पालकांकडून आगाऊ वसूली केली असल्यास ती तात्काळ संबंधित विद्यार्थ्यांच्या खात्यामध्ये ECS व्दारे जमा करण्यात येईल व त्याबाबत संबंधित विद्यार्थ्यास अवगत करण्यात येईल अशा आशयाचे प्रतिज्ञापत्र महाविद्यालयांकडून घेणे बंधनकारक राहील.

६. विद्यार्थ्यांचे जात वैधता प्रमाणपत्र, गॅप आणि ट्रान्सफर प्रमाणपत्र व अन्य कागदपत्रांची तपासणी संबंधित महाविद्यालयाच्या प्राचार्यांकडून प्रमाणित करुन पडताळणी करुनच देयके अदा होतील याची दक्षता घेण्यात यावी.

७. ज्या महाविद्यालयांची विशेष चौकशी पथकामार्फत चौकशी सुरु आहे अशा महाविद्यालयांच्या शिक्षण शुल्क व परीक्षा शुल्काच्या देयकाची अदायगी होणार नाही, त्याच बरोबर ज्या महाविद्यालयांकडून वसुली प्रलंबित आहे अशी वसुली प्रस्तुत प्रलंबित देयकातून प्राथम्याने करण्याची जबाबदारी संबंधित सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण यांची राहील.

८. सन २०१७-१८ या कालावधीत ऑनलाईन व ऑफलाईन पध्दतीने प्राप्त झालेले अर्ज संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयातील अटी व शर्तीच्या अधिन राहून निकाली काढावेत.

उपरोक्त प्रमाणे प्रलंबित अर्ज निकाली काढण्याची कार्यवाही दिनांक २८/०२/२०१९ पर्यन्त पूर्ण करण्यात यावी. त्यानंतर प्रलंबित राहिलेल्या अर्जाबाबत भविष्यामध्ये उद्भवणाऱ्या बाबीस संबंधित सहाय्यक आयुक्त, समाजकल्याण /संबंधित महाविद्यालय सर्वस्वी जबाबदार राहतील. सदरची बाब सर्व महाविद्यालये व संस्था यांना देखील निदर्शनास आणून देण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१९०११९१४४८४५७६२२ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Shri Ravindra Gurav
Date: 2019.01.19 14:55:23 +05'30'

**( रविंद्र गुरव )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत**:-
१) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) प्रादेशिक उपायुक्त समाज कल्याण (सर्व )
३) सहाय्यक आयुक्त समाज कल्याण (सर्व )
४) जिल्हा समाज कल्याण अधिकारी,जिल्हा परिषद (सर्व).